पाहतां शिणले हे नेत्र करूं गत कायी? ।
विपरीत कल्पना बुडवीते भवडोहीं ॥
चाल ॥ तूं सकळ विश्वव्यापक नरहरी गुरुनाथा । अजि गुणवंता! ।
गोविंद द्वैतमति कल्पित नुरेचि आतां । अजि गुणवंता! ॥
मी दास तुझा तूं मुक्तपुरीचा दाता । अजि गुणवंता! ॥
गुरु अभयवरद कर ठेवीं माझे माथां । अजि गुणवंता! ॥
उठाव ॥ आतां उचित जें येईल प्रभुच्या चित्ता ।
करिं क्लेशनिवारण स्वामी रुक्मिणीकांता! ॥ किति० ॥ ३ ॥

